**अनुसूचित जातीच्या औद्योगिक सहकारी संस्थांमधील सर्व संचालक मंडळ/कार्यकारणी सदस्य हे अनुसूचित जातीचे असण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,

## शासन निर्णय, क्रमांक:- मासाका-२०१८/प्र.क्र.२४३/अजाक

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- १४ नोव्हेंबर, २०१८

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक मासाका-२००३/प्र.क्र.१९/ विघयो-२ दि. २७ फेब्रुवारी, २००४.

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक मासाका २००८/प्र.क्र.१५०/ विघयो-२ दिनांक २२ मे, २००८.

३) शासन पुरक पत्र, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक मासाका २०१०/प्र.क्र.५२/ विघयो-२ दिनांक ३० मार्च, २०१०.

४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक सीबीसी/१०/ २०१४/प्र.क्र.१५६/ मावक दिनांक २८ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना:-**

अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना वित्तीय संस्था दीर्घ मुदतीचे कर्ज उपलब्ध करून देण्यास फारशा उत्सूक नसल्याने अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना कर्ज/ भागभांडवल उपलब्ध करून देवून राज्यातील मागासवर्गीय युवकांना उपजीवीकेचे साधन उपलब्ध करून देण्यासाठी व त्यांच्यामध्ये उद्योजकता निर्माण करण्यासाठी अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य करण्याची योजना संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयान्वये राज्यात सुरू करण्यात आलेली होती. सदर योजनेमध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात येवून शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेले आहेत. तथापि सदरचे सर्व शासन निर्णय अधिक्रमित करुन सर्वंकष असा एकच शासन निर्णय दिनांक २२ मे, २००८ अन्वये निर्गमित करण्यात आलेला आहे.

सदर योजनेअंतर्गत लाभार्थी संस्थेच्या संचालक मंडळावर/कार्यकारणीवर ११ सदस्य असतील त्यापैकी एक सदस्य अमागासवर्गीय व उर्वरित सदस्य अनुसूचित जातीचे असावे, या दि.२२ मे,२००८ मधील मुद्दा क्र.१७ या अटीमध्ये बदल करुन संस्थेच्या संचालक मंडळावरील अध्यक्ष, उपाध्यक्ष, सचिव तसेच संचालक व मंडळावरील सर्व सदस्य हे अनुसूचित जातीतीलच असावेत ही बाब शासनाच्या
विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालील अटींचा समावेश करण्यात येत असून, सदर अटीं नवीन प्रस्तावांना लागू राहतील.

**शासन निर्णय:-**

१. “अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य” या योजने अंतर्गत "लाभार्थी संस्थेचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, सचिव तसेच संचालक मंडळावरील सर्व सदस्य हे अनुसूचित जातीचेच असणे बंधनकारक करण्यात येत आहे.
२. बांधकाम, मशीनरी, विद्युतीकरण या संदर्भातील उपयोगिता प्रमाणपत्र व मुल्यांकन प्राप्त होण्यास विलंब होतो.

उपयोगीता प्रमाणपत्र प्राप्त करण्याची कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील.

अ) इमारत बांधकामाकरिता कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचेकडून प्रमाणित करुन घ्यावे.

ब) विद्युतीकरणांच्या कामाकरीता कार्यकारी अभियंता (विद्युत) सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचेकडून प्रमाणित करुन घ्यावे.

क) मशीनरी बाबत जिल्हा उद्योग अधिकारी यांचेकडून प्रमाणित करुन घ्यावे.

ड) संस्थेच्या लेखापरिक्षण विषयक बाबी लेखापरिक्षक वर्ग १, सहकारी संस्था यांचेकडून प्रमाणित करुन घ्यावे.

उपरोक्त सर्व बाबी प्रमाणित करुन घेतल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी अथवा जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांचेकडून प्राप्त करुन घ्यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१११४१४५०४१०३२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.11.14 15:01:07 +05'30'

(दि.रा.डिंगळे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा. विधान सभा सदस्य व विधान परिषद सदस्य.
५. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) -१, महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरीक्षा) -२, महाराष्ट्र, नागपूर.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२, महाराष्ट्र, नागपूर.
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. विभागीय आयुक्त, सर्व विभाग.
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा.

१७. सर्व सह / उप सचिव, अवर सचिव, कार्यासन अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. उपायुक्त, समाजकल्याण, सर्व प्रादेशिक विभाग.
१९. सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण.
२०. निवडनस्ती/अजाक.